सन २०२३-२४ मध्ये “पुनर्विनियोजनाने तरतूद उपलब्ध करुन देण्याबत” मागणी क्र. के-११, लेखाशिर्ष “४८०१ वीज प्रकल्पांवरील भांडवली खर्च व ६८०१ वीज प्रकल्पांसाठी कर्जे”

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन निर्णय क्र. पुनर्वि-२०२३/प्र.क्र. १८/ उर्जा-३**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक:- ३१ मार्च, २०२४.

**संदर्भ :-** उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, शासन निर्णय क्र.पुरमा २०२२/प्र.क्र.१८/ऊर्जा-३, दि.०१.०२.२०२४.

**प्रस्तावना :-**

ऊर्जा विभागाच्या अधिपत्याखालील महानिर्मिती कंपनीकडून के.एफ.डब्ल्यू. जर्मन बँकेच्या सहकार्याने सौर प्रकल्प राबविण्यात येत असून सदर कर्जाची रक्कम रु.३५,८५,०९,०००/- केंद्र शासनामार्फत परस्पर भेल कंपनीस अदा करण्यात आली आहे. महालेखापाल कार्यालयाने दि.१४.०२.२०२४ रोजीच्या पत्रान्वये पीव्ही ऊर्जा प्रकल्पांसाठी आरबीआय सीएएस नागपूरकडून प्राप्त झालेल्या रु.५५१०.२४ लाखांच्या खर्चासाठी मुख्य लेखाशिर्ष "८६५८-११० CAORB सस्पेन्स" अंतर्गत थकबाकी दर्शविण्यात आल्याचे कळविले आहे. सदर खर्चाच्या थकबाकीची रक्कम केंद्र सहाय्यित कर्ज/ अनुदान, इ. स्वरुपात थेट या विभागाच्या अंतर्गत अंमलबजावणी करणाऱ्या संस्थांना दिली जात असून ही रक्कम संबंधित लेखाशिर्षांच्या अंतर्गत खर्चासाठी पुस्तकी समायोजनेद्वारे दर्शविणे आवश्यक असल्याचे महालेखापाल कार्यालयाने कळविले आहे. सदर रकमेपैकी रु.१९२५.१५ लाख इतक्या रकमेचे संदर्भाधिन दि.०१.०२.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये समायोजन करण्यात आले आहेत. यानुषंगाने आता त्याच मागणी क्रमांकाखालील अन्य लेखाशिर्षाखालील बचतीच्या रकमेतून पुनर्विनियोजनाने उर्वरित रक्कम उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

या विभागाच्या मागणी क्र. के-११, खालील लेखाशिर्ष ४८०१ वीज प्रकल्पांवरील भांडवली खर्च, (०२) औष्णिक वीज निर्मिती, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणुका,००, (००)(०८) महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनीस भाग भांडवल (कार्यक्रम), ५४ गुंतवणुका (४८०१४०८६) (दत्तमत) या लेखाशिर्षाखालील बचतीच्या रक्कमेमधून रु.३५,८५,०९,०००/- (रुपये पस्तीस कोटी पंच्याऐंशी लाख नऊ हजार मात्र) रक्कम पुनर्विनियोजनाने मागणी क्र. के-११, ६८०१ वीज प्रकल्पांसाठी कर्जे, ००, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे, ००, (००)(०४) सौर ऊर्जा प्रकल्पासाठी के.एफ.डब्ल्यू. जर्मन बँकेकडून महाराष्ट्र राज्य वीज निर्मिती कंपनीला कर्जे (कार्यक्रम), ५५ कर्जे व आगाऊ रकमा (६८०१०६६५) (दत्तमत) या लेखाशिर्षाखाली पुनर्विनियोजनाने सोबत जोडलेल्या तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२४०३३११४५८२३४५१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DR. GAURI RAKESH PATIL

Digitally signed by DR. GAURI RAKESH PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRY ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=1fb6342b2e518b7b62c5e76771a2798f4bed2e746f3e27ba3a43ef40e20d8979, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1B8FA6FD8474E1D5982D81B6510A6CD24CC422976DC8735D4C6A4C519341E344, cn=DR. GAURI RAKESH PATIL
Date: 2024.03.31 15:15:50 +05'30'

**( डॉ. गौरी पाटील )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, यांचे सचिव,राजभवन,मलबार हिल,मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा. उपमुख्यमंत्री (ऊर्जा), यांचे सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन), यांचे सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
५. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, विधानमंडळ सचिवालय,विधानभवन, मुंबई-३२.
६. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (वित्त) मंत्रालय, मुंबई-३२.
८. अपर मुख्य सचिव (ऊर्जा) उद्योग,ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९. प्रधान सचिव (नियोजन) मंत्रालय, मुंबई-३२.
१०.अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सुत्रधारी कंपनी, फोर्ट, मुंबई.
१२.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज निर्मिती कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई.
१३.सचिव, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, वर्ल्ड ट्रेड सेंटर नं.१, १३ वा मजला, कुलाबा, मुंबई.
१४.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर
१५.महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई
१६.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१७.निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
१८.उप सचिव, ऊर्जा-४, उद्योग,ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१९.वित्त विभाग, कार्यासन-व्यय-१६/अर्थ-१४/ऋण व हमी, मंत्रालय, मुंबई-३२
२०.कक्ष अधिकारी (नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई-३२
२१.निवड नस्ती (ऊर्जा-३), उद्योग,ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.पुनर्वि-२०२३/प्र.क्र.१८/ऊर्जा-३, दिनांक ३१ मार्च, २०२४ (आकडे रुपयांत)

| अ.क्र. | गौण / उपशिर्ष | पुनर्विनियोजन करेपर्यंत वितरित केलेला निधी | पुनर्विनियोजन करेपर्यंत मंजूर अनुदान/विनियोजन (सुधारित अंदाज) | पुनर्विनियोजन करावयाची रक्कम | पुनर्विनियोजनानंतर होणारी रक्कम | फरकाची कारणे |
|---|---|---|---|---|---|---|
| | **तरतूदीमध्ये किंवा विनियोजनामध्ये घट (-) प्रस्तावित आहे असे लेखाशिर्ष** | | | | | |
| १ | मागणी क्र. के-११, मुख्य लेखाशिर्ष ४८०१ वीज प्रकल्पांवरील भांडवली खर्च, (०२) औष्णिक वीज निर्मिती, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणुका,००, (००)(०८) महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनीस भाग भांडवल (कार्यक्रम), (४८०१ ४०८६) (दत्तमत) | | | | | महालेखापाल कार्यालयाकडे निलंबन लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात आलेल्या खर्चाच्या समायोजनासाठी तरतूद आवश्यक असून सदर योजनेच्या शिल्लक असलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून आवश्यकतेप्रमाणे पुनर्विनियोजनाने घट प्रस्तावित करण्यात आलेली आहे. |
| | ५४ गुंतवणुका | १०५,७६,००,००० | ३३०,४०,००,००० | (-) ३५,८५,०९,००० | १८८,७८,९१,००० | |
| | **एकूण घट** | | | (-) ३५,८५,०९,००० | १८८,७८,९१,००० | |
| २ | मागणी क्रमांक के-११, मुख्य लेखाशिर्ष ६८०१ वीज प्रकल्पांसाठी कर्जे, ००, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे, ००, (००)(०४) सौर ऊर्जा प्रकल्पासाठी के.एफ.डब्ल्यू. जर्मन बँकेकडून महाराष्ट्र राज्य वीज निर्मिती कंपनीला कर्जे (कार्यक्रम), (६८०१ ०६६५) (दत्तमत) | | | | | महालेखापाल कार्यालयाकडे निलंबन लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात आलेल्या खर्चाच्या समायोजनासाठी तरतूद आवश्यक असून सदर योजनेच्या शिल्लक असलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीमधून आवश्यकतेप्रमाणे पुनर्विनियोजनाने वाढ प्रस्तावित करण्यात आलेली आहे. |
| | ५५ कर्जे व आगाऊ रकमा | ३२,१३,०६,००० | ३२,१३,०६,००० | (+) ३५,८५,०९,००० | ६७,९८,१५,००० | |
| | **एकूण वाढ** | | | (+) ३५,८५,०९,००० | ६७,९८,१५,००० | |

प्रमाणित करण्यात येते की, सक्षम प्राधिकाऱ्यांकडून मंजूर न केलेला असा खर्च भागविण्यासाठी म्हणून सदर तक्त्यामध्ये समाविष्ट केलेल्या रकमांचे पुनर्विनियोजन करण्यात आलेले नाही. तसेच एखाद्या नविन सेवेवरील खर्च म्हणजे सेवेचा नवा प्रकार किंवा सेवेचे नविन साधन ज्यासाठी चालू वर्षाच्या अर्थसंकल्पात तरतूद करण्यात आलेली नाही किंवा त्यासाठी विधानसभेकडून लाक्षणिक पूरक मागणीद्वारे मंजूरी घेण्यात आलेली नाही, असा खर्च भागविण्यासाठी सदरचे पुनर्विनियोजन करण्यात आलेले नाही.

DR. GAURI RAKESH PATIL

Digitally signed by DR. GAURI RAKESH PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRY ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=1fb6342b2e518b7b62c5e76771a2798f4bed2e746f3e27ba3a43ef40e20d8979, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1B8FA6FD8474E1D5982D81B6510A6CD24CC422976DC8735D4C6A4C519341E344, cn=DR. GAURI RAKESH PATIL
Date: 2024.03.31 15:16:38 +05'30'

**(डॉ.गौरी पाटील)**
**कार्यासन अधिकारी महाराष्ट्र शासन**